**महाराष्ट्र सागरी किनारपट्टी क्षेत्रातील गौण खनिजाच्या अवैध उत्खनन व वाहतूकीस आळा घालण्याकरीता दक्षता पथक स्थापन करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. गौखनि-१०/०९२२/प्र.क्र.६७/ख-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २७ मार्च, २०२३

वाचा: १) महाराष्ट्र गौण खनिज उत्खनन (विकास व विनियमन) नियम,२०१३
२) शासन परिपत्रक क्रमांक:गौखनि-१०/०३१६/प्र.क्र.२०४/ख, दि.१४/०६/२०१७
३) शासन निर्णय, क्रमांक:गौखनि-१०/०५२१/प्र.क्र.१४२/ख-२, दि.२९/०६/२०२१
४) शासन निर्णय, क्रमांक:गौखनि-१०/१०२१/प्र.क्र.८२/ख-१, दि.२८/०१/२०२२

**प्रस्तावना:**

महाराष्ट्र गौण खनिज उत्खनन (विकास व विनियमन) नियम,२०१३ अन्वये राज्यातील गौण खनिज उत्खननाचे विनियमन करण्याकरीता नियम तयार करण्यात आले आहेत. सदर नियम शासन अधिसूचना दि.१८/०७/२०१३ अन्वये राजपत्रात प्रसिध्द करण्यात आले आहेत.

केंद्र शासनाच्या पर्यावरण, वन व वातावरणीय बदल मंत्रालयाने वेळोवेळी दिलेल्या मार्गदर्शक सूचना तसेच मा.सर्वोच्च न्यायालय, मा.उच्च न्यायालय व मा.हरित लवादाचे निकष तसेच काही ठळक राज्यांच्या वाळू धोरणाचा अभ्यास करुन सर्वकष वाळू/रेती निर्गती धोरण शासन निर्णय, दि.२८/०१/२०२२ अन्वये निर्गमित करण्यात आले आहे.

राज्याच्या विकासात गौण खनिजाचे महत्व अनन्यसाधारण आहे. मोठे, मध्यम व लघु प्रकल्प, रस्ते बांधकाम इ.पायाभूत सुविधांसाठी गौण खनिजांचा प्रामुख्याने वापर केला जातो. गौण खनिजांच्या उपलब्धतेवर पायाभूत सुविधा उभ्या करणे अवलंबून असते. शासनाने गौण खनिजांचे अवैध उत्खनन व वाहतूकीस आळा घालण्याकरीता वेळोवेळी उपाययोजना केल्या आहेत. तरीही गौण खनिजाचे अवैध उत्खनन व वाहतूक सुरु असल्याच्या काही घटना शासनाच्या निदर्शनास येत आहेत. गौण खनिजाचे अवैध उत्खनन व वाहतूकीस प्रभावीरित्या आळा घालण्याकरीता महाराष्ट्र सागरी किनारपट्टी क्षेत्रात दक्षता पथक स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र सागरी किनारपट्टी क्षेत्रातील गौण खनिजाच्या अवैध उत्खनन व वाहतूकीवर नियंत्रण ठेवण्यासाठी आणि आकस्मिक तपासणीसाठी खालील अधिकाऱ्यांचा समावेश असलेले
जिल्हाधिकारी यांच्या नियंत्रणाखालील दक्षता व निरीक्षण पथक स्थापन करण्यात येत आहे. :-

| | | | |
|---|---|---|---|
| १) | अपर जिल्हाधिकारी/ उप जिल्हाधिकारी/तहसिलदार | - | पथक प्रमुख |
| २) | सिडको, नवी मुंबई यांचे प्रतिनिधी (आवश्यक तेथे) | - | सदस्य |
| ३) | महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई यांचे प्रतिनिधी | - | सदस्य |
| ४) | पोलीस आयुक्त/पोलीस अधिक्षक यांचे प्रतिनिधी | - | सदस्य |
| ५) | वन विभागाचे प्रतिनिधी | - | सदस्य |
| ६) | महानगरपालिका/नगरपालिका/नगरपंचायत यांचे प्रतिनिधी | - | सदस्य |
| ७) | प्रादेशिक परिवहन अधिकारी यांचे प्रतिनिधी | - | सदस्य |
| ८) | जिल्हा अधिक्षक, भूमि अभिलेख यांचे प्रतिनिधी | - | सदस्य |
| ९) | जिल्हा खनिकर्म अधिकारी | - | सदस्य सचिव |

जिल्हाधिकारी, त्यांच्या जिल्ह्यात उपरोक्त अधिका-यांचा समावेश असलेले एकापेक्षा जास्त पथके गठीत करु शकतील.

सदर दक्षता पथकाने, महसूल व वन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक:-गौखनि १०/०३१६/प्र.क्र.२०४/ख, दि.१४/०६/२०१७ मध्ये निर्देशीत केलेल्या तरतुदीनुसार तसेच, प्रचलित धोरणाप्रमाणे गौण खनिजाच्या अवैध उत्खनन व वाहतूकीच्या प्रकरणी कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०४०३११५८५६६५१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SHIVAJI SONAJI CHOURE

Digitally signed by SHIVAJI SONAJI CHOURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fa37c7e079f23b78a27c84b9d6e46f94d549fc79ba170d5815f3619617b13313, pseudonym=0592554E096862442D21372FBE05C91C3D50FA17, serialNumber=03FE2B2D715BED4B0D90A99525AE06946672E68EA905C97DA50B34FD21223011, cn=SHIVAJI SONAJI CHOURE
Date: 2023.04.03 12:06:01 +05'30'

**( शिवाजी चौरे )**
**अवर सचिव, महसूल व वन विभाग**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष/विरोधी पक्षनेते (विधानसभा) यांचे सचिव
५) मा.सभापती/उप सभापती/विरोधी पक्षनेते (विधानपरिषद) यांचे सचिव
६) मा.मंत्री (महसूल), महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७) सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य
८) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
९) अपर मुख्य सचिव (परिवहन) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) अपर मुख्य सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
११) प्रधान सचिव,वने मंत्रालय,मुंबई.
१२) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे
१३) विभागीय आयुक्त, कोकण, नवी मुंबई
१४) व्यवस्थापकीय संचालक, सिडको, नवी मुंबई
१५) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई
१६) जिल्हाधिकारी, ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी व सिंधुदूर्ग
१७) पोलीस आयुक्त, ठाणे/नवी मुंबई
१८) आयुक्त, महानगरपालिका, ठाणे/नवी मुंबई/पनवेल/कल्याण-डोंबिवली/उल्हासनगर/ वसई-विरार/ मिरा-भाईंदर
१९) मुख्याधिकारी, नगरपालिका/नगरपरिषद (कोकण परिक्षेत्रातील)
२०) पोलीस अधीक्षक, पालघर, रायगड, रत्नागिरी व सिंधुदूर्ग
२१) संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर,
२२) निवड नस्ती.